सोलापूर उर्दू घरासाठी वर्ष २०२३-२४ मध्ये
अनुदान वितरित करण्याबाबत.

# महाराष्ट्रशासन
## अल्पसंख्याक विकास विभाग
## शासननिर्णयक्रमांकः सोऊघ २०१४/प्र.क्र.६० (भाग-१)/का.४

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख: २८.०३.२०२४

**वाचा-**

१) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग क्रमांक सोऊघ २०१४/प्र.क्र.६०/का.४, दि.०२.०५.२०१७.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०५.०२.२०२४.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४.
५) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक उघव्य-२०१६/प्र.क्र.१९/कार्या-४, दि.२१ जुलै, २०१६
६) उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांचे पत्र क्रमांकः २०२४/उविअक्र.१/एमएजी/कावि/५५२/२०२४, दि.११.०३.२०२४.
७) उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांचे पत्र क्रमांकः२०२४/उविअक्र.१/एमएजी/कावि/५५१/२०२४, दि.११.०३.२०२४.

**प्रस्तावना-**

संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णय दि.०२.०५.२०१७ अन्वये सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उर्दू घर बांधण्याच्या रु.८,९७,१९,०००/- (रुपये आठ कोटी सत्याण्णव लाख एकोणीस हजार मात्र) इतक्या प्रस्तावास सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. सदर उर्दू घराचे काम पूर्ण झालेले असल्याने संदर्भ क्र.४ येथील तरतूदीस अनुसरुन उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांनी दि.१५.०२.२०२४ रोजी सदर उर्दू घराचा ताबा घेतलेला आहे. आता उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १ यांनी संदर्भ क्र.५ व ६ येथील पत्रान्वये मागणी केल्यानुसार संदर्भ क्र.४ येथील शासन निर्णयानुसार दि.२१.०७.२०१६ च्या शासन निर्णयानुसार नियुक्त १ व्यवस्थापक,१ ग्रंथपाल आणि १ लिपिक टंकलेखक यांचे मानधन आणि उर्दू घराच्या विद्युत जोडणीसाठी आवश्यक असणारा निधी सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

## शासन निर्णय-

उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर यांनी संदर्भ क्र.५ व ६ येथील पत्रान्वये विनंतीच्या अनुषंगाने वित्त विभागाने संदर्भ क्र.१,२,३ येथील परिपत्रके आणि नियोजन व वित्त विभागाने दिलेली मान्यता तसेच अर्थसंकल्प प्रणालीवर उपलब्ध करुन दिलेल्या निधीस अनुसरुन सोलापूर शहरातील सर्वे नं.६१७२ मधील २२७४.४२ चौ.मी. भूखंडावर उभारण्यात आलेल्या उर्दू घरासाठी नियुक्त १ व्यवस्थापक,१ ग्रंथपाल आणि १ लिपिक टंकलेखक यांचे मानधन आणि उर्दू घराच्या विद्युत जोडणीसाठी रु.२,३७,९५८/- (रुपये दोन लाख सदतीस हजार नऊशे अठ्ठावन्न मात्र) इतके अनुदान जिल्हाधिकारी, सोलापूर यांना वितरित करण्यास तसेच जिल्हाधिकारी, सोलापूर यांना वितरित करण्यात आलेला निधी उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १ यांना वितरित करण्यास याद्वारे मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी सदर निधीच्या विनियोगाबाबचे उपयोगिता प्रमाणपत्र विहित नमून्यात शासनास तसेच महालेखाकार कार्यालयास सादर करावे. जिल्हाधिकारी, सोलापूर यांनी सदर खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घ्यावी

३. वरीलप्रमाणे अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी तसेच खर्च करतांना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/ शर्तीचे पालन करणे ही जबाबदारी जिल्हाधिकारी, सोलापूर यांची राहील.

४. सदर प्रयोजनासाठी होणारा खर्च “मागणी क्रमांक झेडई-१ २२३५-सामाजिक सुरक्षा व कल्याण - २००-इतर कार्यक्रम-राज्य योजनांतर्गत योजना- (००)-(००)(१८) - उर्दू घरासाठी सहाय्यक अनुदाने (२२३५ ए ५५२) ३१, सहायक अनुदान (वेतनेतर)” या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकावा व तो सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. हा शासन निर्णय, नियोजन विभाग अनौ.संदर्भ क्र.१६२/१४७१, दि.१८.०३.२०२४ आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१२७/२०२४/व्यय-१, दि.२७.०३.२०२४ तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३, क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.०५.०२.२०२४ आणि क्रमांक अर्थस-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०४.०३.२०२४ अन्वये प्राप्त प्राधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२८१७४५३७६८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

MOHINUDDIN B TASHILDAR

Digitally signed by MOHINUDDIN B TASHILDAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7eac303551c8c1c40121e24c1d7fb18a03efe22c688ba9240e47d3c712ae3ea9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=7E694259001AF4DCAD48B69EB7E39AFC9472E61C49FC40EB7D603AE236006903, cn=MOHINUDDIN B TASHILDAR
Date: 2024.03.28 17:56:54 +05'30'

**( मो. बा. ताशिलदार )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल-१/२ ( लेखापरिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर,
२. प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
३. जिल्हाधिकारी, सोलापूर,
४. उप सचिव (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
५. उपसचिव/अर्थ (अ.वि.वि.), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक,
६. उपाध्यक्ष-उर्दू घर सांस्कृतिक समिती तथा उपविभागीय अधिकारी, सोलापूर क्रमांक १, सोलापूर
७. कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सोलापूर, जि.सोलापूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सोलापूर,
९. कक्ष अधिकारी (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. वित्त विभाग / नियोजन विभाग मंत्रालय, मुंबई,
११. निवडनस्ती (का४-)/कार्यासन४-, संग्रहार्थ.